**राज्यातील न्यायालयामध्ये कंत्राटी तत्वावर नियुक्त ४० सिनिअर सिस्टीम ऑफिसर व १५९ सिस्टीम ऑफिसर या बाह्ययंत्रणेव्दारे भरलेल्या काल्पनिक पदांना पुढील ५ वर्ष कालावधीसाठी मुदतवाढ देण्याबाबत, तसेच याकरिता येणाऱ्या वित्तीय खर्चास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- संकीर्ण-१०२५/प्र.क्र.१/का-९**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- ०३ मार्च, २०२५.

**वाचा :-** १) विधि व न्याय विभाग शासन निर्णय क्र. चौविआ-१२१५/प्र.क्र.९४/१५/का-९, दि.२३.०८.२०१६.
२) विधि व न्याय विभाग शासन निर्णय क्र. संगणक-२०१७/प्र.क्र.०३/का-७, दि.०४.०९.२०१८.
३) मा. उच्च न्यायालयाची (Bombay High Court System Officer on Contract Basis (Conditions of Service) Rules, २०१६) अधिसूचना, दि.२५.०९.२०१८.
४) विधि व न्याय विभाग शासन निर्णय क्र. कौटुंन्या-१११६/प्र.क्र.२२२/का-९, दि.०३.०७.२०२०.
५) विधि व न्याय विभाग शासन निर्णय क्र. चौविआ-१२२०/प्र.क्र.४/का-९, दि.१७.०२.२०२१.
६) रिट याचिका क्र.१३०५३/२०२४ आणि रिट याचिका क्र.९३४०/२०२४ याचिकांमध्ये मा.उच्च न्यायालयाने दिलेले दि.०४.०२.२०२५ रोजीचे आदेश.
७) मा.उच्च न्यायालयाचे पत्र क्र.F&B/१४th F.C./११६/२०२४-२५, दि.१०.०२.२०२५.
८) मा. मंत्रिमंडळाच्या दि.०२.०३.२०२५ रोजीच्या बैठकीतील निर्णय.

**प्रस्तावना :-**

१४ व्या वित्त आयोगांतर्गत तांत्रिक मनुष्यबळ सहाय्य या घटकाखाली मा. उच्च न्यायालय व इतर न्यायालयांसाठी ४० सिनिअर सिस्टीम ऑफिसर व १५९ सिस्टीम ऑफिसर अशी एकूण १९९ पदे निर्माण करुन बाह्ययंत्रणेव्दारे भरण्यास दि.०४.०९.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर बाह्ययंत्रणेव्दारे भरलेल्या काल्पनिक पदांना नियुक्तीच्या दिनांकापासून पुढील ५ वर्षाच्या कालावधीसाठी दि.०३.०७.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. त्यानुषंगाने, मा. उच्च न्यायालयाने दि.२५.०९.२०१८ रोजीच्या अधिसूचनेव्दारे Bombay High Court System Officer on Contract Basis (Conditions of Service) Rules, २०१६ प्रसिध्द केले आहे. त्यानुसार, मा. उच्च न्यायालयाने मा. उच्च न्यायालयात तसेच अधिनस्त न्यायालयात सिनिअर सिस्टीम ऑफिसर व सिस्टीम ऑफिसर यांची

कंत्राटी तत्वावर नियुक्त्या केल्या आहेत. तसेच, दि.१७.०२.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये, १४ व्या वित्त आयोगांतर्गत "न्यायव्यवस्थेचे सक्षमीकरण" (Strengthning the Justice Sector) या प्रयोजनासाठी शिफारस केलेल्या अतिरीक्त न्यायालये, जलदगती न्यायालये, कौटुंबिक न्यायालये व तांत्रिक मनुष्यबळ सहाय्य या घटकांकरीता दि.३१ मार्च, २०२० नंतर पुढील कालवधीकरीता निधी उपलब्ध करून देण्याबाबत राज्य शासनाने निर्णय घेतला आहे. सदर पदांचा कालावधी सन २०२५ मध्ये विविध दिनांकास संपत असल्याने, राज्यातील न्यायालयामध्ये नियुक्त कंत्राटी सिनिअर सिस्टीम ऑफिसर व सिस्टीम ऑफिसर यांनी दाखल केलेल्या रिट याचिका क्र.१३०५३/२०२४ आणि रिट याचिका क्र.९३४०/२०२४ या याचिकेव्दारे राज्यातील न्यायालयामध्ये नियुक्त कंत्राटी सिनिअर सिस्टीम ऑफिसर व सिस्टीम ऑफिसर यांच्या सेवा समाप्त करण्यात येऊ नये व त्यांचे मा. न्यायालयाच्या सेवेत कायम समावेशन करण्याबाबत विनंती केली. सदर याचिकेमध्ये मा. उच्च न्यायालयाने दिलेले दि.०४.०२.२०२५ रोजीचे आदेश आणि सदर प्रकरणी मा. उच्च न्यायालयाने केलेल्या शिफारशीनुसार, सदर पदांना त्यांच्या कंत्राटी सेवा ज्या दिनांकास संपत आहे त्या दिनांकाच्या पुढील दिनांकापासून पुढील ५ वर्ष कालावधीसाठी मुदतवाढ देण्याची आणि त्याकरीता निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील न्यायालयामध्ये कंत्राटी तत्वावर नियुक्त ४० सिनिअर सिस्टीम ऑफिसर व १५९ सिस्टीम ऑफिसर या बाह्ययंत्रणेव्दारे भरलेल्या काल्पनिक पदांना, त्यांच्या कंत्राटी सेवा ज्या दिनांकास संपत आहे त्या दिनांकाच्या पुढील दिनांकापासून पुढील ५ वर्ष कालावधीसाठी **दुसरी** मुदतवाढ देण्याच्या, तसेच याकरिता सन २०२५-२०२६ ते सन २०२९-२०३० या पाच वर्षाच्या कालावधीत येणाऱ्या (खालील तक्त्यात नमुद वर्षनिहाय खर्चास) एकूण रु. ५९,२३,२०,०००/- इतक्या आवर्ती खर्चास मंजूरी देण्याच्या प्रस्तावास "एक विशेष बाब"म्हणून वित्त विभागाच्या खालील अटींच्या अधीन मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | वित्तीय वर्ष | पदनिहाय वार्षिक खर्च | | एकूण वार्षिक खर्च (रुपये) |
|---|---|---|---|---|
| | | सिनिअर सिस्टीम ऑफिसर (रुपये) | सिस्टीम ऑफिसर (रुपये) | |
| १ | २०२५-२०२६ | २,२०,८०,००० | ७,६३,२०,००० | ९८,४०,००,००० |
| २ | २०२६-२०२७ | २,४४,८०,००० | ८,३९,५२,००० | १०,८४,३२,००० |
| ३ | २०२७-२०२८ | २,६८,८०,००० | ९,१५,८४,००० | ११,८४,६४,००० |
| ४ | २०२८-२०२९ | २,९२,८०,००० | ९,९२,१६,००० | १२,८४,९६,००० |
| ५ | २०२९-२०३० | ३,१६,८०,००० | १०,६८,४८,००० | १३,८५,२५,००० |
| | एकूण खर्च | १३,४४,००,००० | ४५,७९,२०,००० | ५९,२३,२०,००० |

अ) मा. उच्च न्यायालयाने वाह्यस्त्रोताव्दारे करारपध्दतीने भरण्यात येणाऱ्या कर्मचाऱ्यांना नेहमी मुदतवाढ न देता, शासन धोरणानुसार विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन निविदा प्रक्रियेव्दारे करारपध्दतीने घेण्याबाबत कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी.

ब) बाह्ययंत्रणेव्दारे सेवा घेताना, वित्त विभागाच्या दिनांक २७.०४.२०२२ च्या शासन निर्णयातील मार्गदर्शक तत्वांचे अनुपालन करण्याची दक्षता संबंधित न्यायालयाने घ्यावी.

२. याकरीता येणारा खर्च मागणी क्रमांक जे-१,२०१४, न्यायदान, १०२-उच्च न्यायालये (१२) (०१) तांत्रिक मनुष्यबळ सहाय्य (अनिवार्य), सांकेतांक क्रमां (२०१४ ०५५७) या लेखाशिर्षाखाली १०-कंत्राटी सेवा या उद्दिष्टांतर्गत सन २०२५-२०२६ ते सन २०२९-२०३० या आर्थिक वर्षासाठी तरतूद करुन मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीमधून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौ.सं.क्र. २४५/व्यय-५, दि.२१.०२.२०२५ अन्वये तसेच, मा. मंत्रिमंडळाच्या दि.०२.०३.२०२५ रोजीच्या बैठकीत झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२५०३०३१८२२०६४२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHISH ARVINDRAO AYACHIT

Digitally signed by ASHISH ARVINDRAO AYACHIT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=3d6a5e330b3b57f01daab1dbb0968a1823ebae88f93a4b8312e0276db894e483, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7192473332944CE7C0ACBF0C66959B3BC3088FE6AC83A09BD02BC394AED7EA8D, cn=ASHISH ARVINDRAO AYACHIT
Date: 2025.03.03 18:22:53 +05'30'

**( आशिष अ. अयाचित )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रतः**

१. मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री तथा मा. मंत्री, वित्त व नियोजन यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उपमुख्यमंत्री तथा मा. मंत्री, नगर विकास यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
६. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. मा. महाप्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई.
८. मा. प्रबंधक (वित्त व अर्थसंकल्प)/(निरीक्षणे-१)/(वित्त व अर्थ), मा. उच्च न्यायालय, मुंबई.
९. मा. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, सर्व जिल्हा व सत्र न्यायालये.
१०.मा. प्रमुख न्यायाधीश/अतिरिक्त न्यायाधीश, सर्व कौटुंबिक न्यायालये.
११.मा. महालेखापाल- एक /दोन(लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व जिल्हा कोषागार कार्यालये.
१३.वित्त विभाग-व्यय-५/अर्थ-११, मंत्रालय, मुंबई.
१४.विधि व न्याय विभाग-कार्यासन-२३, मंत्रालय, मुंबई.
१५.विधि व न्याय विभाग सर्व कार्यासने.
१६.निवड नस्ती/का.९.